# देवाचा विदुषक

**इटलीची लोककथा**

टॉमी पाउलो



छोटा मुलगा जियोवानी गरीब आणि बेघर आहे.पण तो काहीतरी अद्भुत करू शकतो. तो एखाद्या जादूगारा सारखी ‘ करामत’ करू शकतो.

सोरेंटोतल्या लोकांना त्याच्या प्रतिभेचे आश्चर्य वाटते आणि लवकरच तो पूर्ण इटली मध्ये रंगीत चेंडूचे इंद्रधनुष्य तयार करण्यासाठी प्रसिद्ध होतो. जे मुलांना आणि मोठ्यांना दोघांना एकसारखे खुश करते.

पण जस जशी वर्षे पुढे सरकतात, जियोवानी म्हातारा होतो. आणि तो आपले कौशल्य विसरून जातो. आता तो एक प्रसिद्ध कलाकार राहत नाही. तो परत एक गरीब आणि बेघर होवून जेवणासाठी भीक मागतो.

मग एका ख्रिसमसच्या पूर्व संध्येला जियोवानी रंगित चेंडूचे आपले इंद्रधनुष्य परत वर उचलतो आणि मग अजून एक चमत्कार होतो.





सोरेंटोमध्ये  कितीतरी वर्ष पहिले ...

...एक छोटा मुलगा राहत होता, ज्याचे नाव जियोवानी  होते, न त्याला आई होती न वडील. तो जुने फाटके कपडे घालत असे आणि घरोघर जाऊन पोळीची भीक मागत असे आणि मग कोणाच्या दाराच्या समोर जाऊन झोपत असे.

पण तो खुश होता, कारण तो काहीतरी अद्‌भुत करु शकत होता.

तो जादूगरासारखा अनेक चेंडू हवेत एकाचवेळी फेकून त्यांना पकडू शकत होता. तो ‘करामत’ करू शकत होता.

रोज तो मिस्टर बैप्टिस्टा च्या फळभाजीच्या  टपरीवर जात असे आणि ‘करामत’ करत असे..



तो लिंबू, संत्री, सफरचंद आणि वांगी हवेत फेके आणि परत पकडत असे.



जियोवानीच्या करामती बघायला खूप गर्दी होत असे. आणि जेव्हा जियोवानीचा खेळ संपे, तेव्हा गर्दी मिस्टर बैप्टिस्टा कडून भाज्या आणि फळं घेत असे. त्यानंतर मिस्टर बैप्टिस्टाची पत्नी, जियोवानीला एक वाडगं गरम सूप देत असे. ही एक खूप चांगली व्यवस्था होती.



एक दिवस एक फिरती सर्कस त्याच्या शहरात आली. त्यात जियोवानीने अर्लेचिनो आणि कोलम्बिना ला सुंदर कपड़े घालून नृत्य करतांना आणि गातांना पाहिलं.

"ओह," जियोवानी  स्वतःही म्हणाल, “मलाही असेच जीवन पाहिजे.”

म्हणून जेव्हा सर्कस संपली,तेव्हा जियोवानी सर्कसच्या उस्तादाशी बोलला.

“नाही,नाही,”  उस्ताद म्हणाला. “मला तुझ्यासारखे सडक छाप भिकारी मुलांची गरज नाही. दुसरीकडे कुठे जाऊन भीक मग.”

“पण माझी खूप मदत होऊ शकते,” जियोवानीने विनंती केली. “ मी सामान बांधायला व सोडायला मदत करू शकतो. मी गाढवांची देखभाल करू शकतो. आणि, उस्ताद," जियोवानी ने पुढे जोडलं, “मी जादूगारासारख्या  “करामती ,जगलिंग “ही करू शकतो.”



“ वाईट नाही हे,”  “करामती” बघितल्यावर उस्ताद म्हणाला. “थोडे अजून प्रशिक्षण आणि सराव  केल्यावर तू अजून उत्तम करशील.! पण मी पैसे देणार नाही. झोपायला जागा, इटली तल्या उत्तम खेळाडूंचा सहवास आणि खाण्याच्या वेळी एक वाडगं भरून नुडल्स. बास एवढंच तुला मिळेल.”

"ठीक  आहे,आभारी आहे!”  जियोवानी म्हणाला.

“जा, आपलं सामान घेवून ये. आम्ही एका तासात इथून निघणार आहोत,” उस्ताद म्हणाला.

मग जियोवानीने मिस्टर आणि मिसेस बॅप्टिस्टा ला अच्छा म्हटलं आणि सर्कस मध्ये एक कलाकार झाला.



काही काळानंतर, उस्तादने त्याला एक पोशाख दिला आणि जियोवानी गर्दीसमोर आपल्या करामती दाखवू लागला.

तो एका विदूषकाच्या चेहऱ्याचा मुखवटा घालत असे आणि नाटक सुरु होण्याआधी पडद्याच्या बाहेर येवून अभिवादन करत असे. मग तो रंगीत  पिशवी उघडून एक गालिचा टाकत असे आणि आपल्या करामती सुरु करत असे.

सगळ्यात आधी तो हवेत बांबूच्या दांड्या फेकून त्यांना पकडत असे. मग हवेत ताटल्या फेकत असे.

आणि मग तो दांड्यावर ताटल्या ठेवून  त्या संतुलित करत त्यांना फिरवत असे. मग तो तारेची रिंग आणि पेटती मशाल हवेत फेकून पकडत असे.





शेवटी तो एक लाल चेंडू आणि एक नारंगी चेंडू फेकत असे. मग एक पिवळा चेंडू .

मग एक हिरवा,निळा आणि जांभळा चेंडू फेकत असे. असे वाटे की हा जादुगार रंगीत चेंडूचे इंद्रधनुष्य तयार करत आहे..

"आणि आता स्वर्गात सूर्य! तो ओरडे. तो करामत दाखवण्यासाठी एक चमकणारा, सोनेरी चेंडू उचले आणि त्याला उंच खूप उंच, जोरात खूप जोरात फेकत असे. ते बघून गर्दी एकदम उत्साहित होत असे.



लवकरच जियोवानी खूप प्रसिद्ध झाला. आणि शेवटी त्याने सर्कस सोडली आणि स्वतः शहरा शहरात जाऊन आपल्या करामती दाखवू लागला.

त्याने इटलीतल्या सर्व शहरांत प्रवास केला, आणि अजूनही त्याचा पोशाख खूप सुंदर होता. पण तरीही तो आपल्या चेहऱ्यावर विदुषकाचा मुखवटा  घालत असे.

एक दा त्याने ड्युकसाठी  "करामती" केल्या.

मग त्याने एका राजकुमाराला आपल्या करामती दाखवल्या.

आणि तो नेहमी असेच करे.

पहिल्या दांड्या, मग ताटल्या, मग तारेची रिंग आणि पेटती मशाल.

शेवटी, तो रंगीत चेंडूचे इंद्रधनुष्य दाखवत असे.

“आणि आता स्वर्गात सूर्य बघा! तो ओरडे,आणि सोनेरी चेंडू उंच खूप उंच उद्वे आणि मग गर्दीत हसू पसरे. मग टाळ्या वाजत आणि जयजयकार होई.



एक दिवस, दोन शहराच्या मध्ये होणाऱ्या यात्रेच्यावेळी जियोवानी एका झाडाच्या सावलीत पोळी आणि पनीर खात होता. दोन साधू रस्त्यावरून त्याच्याकडे आले.

“तू तुझे जेवण आमच्या बरोबर वाटशील का? चांगल्या विदुषका,” त्यांनी विचारलं. “देवाचे प्रेम आणि आमचे संत फ्रांसिसच्या आशीर्वादासाठी ?”

"बसा, मित्रांनो ,” जियोवानी म्हणाला. “माझ्याजवळ खूप अन्न आहे.”

मग तीन लोकांनी जेवण केलं. दोन्ही साधूंनी जियोवानी ला सांगितलं की कसे ते एका शहरातून दुसऱ्या शहरात फिरतात. जेवणासाठी ते भिक्षा मागतात आणि परमेश्वराच्या प्रेम आणि आनंदाच्या संदेशाचा प्रसार करतात.

“ आमचे संस्थापक, संत फ्रांसिस, म्हणतात की प्रत्येकजण देवाचा महिमा गीत गातात. एवढंच नाहीतर आपली करामत सुद्धा पूजेसारखीच आहे,” साधुंपैकी एकजण म्हणाला.

“ आपल्यासारख्या लोकांसाठी हे ठीक आहे, पण मी तर केवळ लोकांना हसवण्यासाठी आणि टाळ्या वाजवण्यासाठी माझ्या करामती दाखवतो.” जियोवानी म्हणाला.

“गोष्ट तीच आहे,” साधू म्हणाले. जर तू लोकांना आनंद देतो, तर तू देवाची पण पूजा करतो.”

“जर तुम्ही म्हणत आहात तर असेल!” जियोवानी हसत म्हणाला. “पण आता मला पुढच्या शहरासाठी निघावं लागेल, अच्छा भावांनो तुम्हांला शुभेच्छा.



आणि मग  जियोवानी  जिथं गेला, हवेत त्याच्या जादूची प्रसिद्धी पसरली आणि  त्याच्या बाटल्या आणि अंगठ्या आणि मशालीनी हवेत आपली कमाल दाखवली. आणि नेहमी तो शेवटी लोकांना रंगीत चेंडूचे इंद्रधनुष्य आणि स्वर्गातला सूर्य दाखवत असे.



आणि जियोवानी  जिथं जाई, गर्दीच्या चेहऱ्यावर हसू येई, आणि हसू आणि जयजयकाराचा आवाज शहरात गुंजत असे.

अशा प्रकारे खूप वर्षे निघून गेली.

आता जियोवानी  म्हातारा झाला होता आणि त्याच्यासाठी कठीण काळ होता.

लोक आता त्याचा कार्यक्रम बघायला थांबत नसत. “ तो एक जुना विदूषक आहे, जो वस्तू हवेत फेकून झेलतो. आपण सगळ्यांनी ते आधी पाहिलं आहे,” लोक म्हणत.



त्यामुळे जियोवानी दुःखी होत असे. मग एक दिवस जेव्हा त्याने करामती  दाखवल्या, फक्त ‘स्वर्गातला सूर्य ‘दाखवला नाही. आणि रंगीत चेंडूचे इंद्रधनुष्य  तर बिघडून गेले  आणि मग त्याच्या चारी बाजूला उभी असणाऱ्या गर्दीने त्याची चेष्टा करायला सुरुवात केली.

आता लोक खुश नव्हते.

मग गर्दीने एक भयानक काम  केलं. त्यांनी जियोवानीवर भाज्या आणि दगड फेकले. मग त्याला आपला जीव वाचवण्यासाठी पळावे लागले.





एका नाल्याजवळ, जियोवानीने आपल्या विदुषकाचा मुखवटा उतरवून टाकला. त्याने आपल्या दांड्या, ताटल्या आणि रंगीत चेंडू लपवून ठेवले. त्याने आपला पोषाख काढून टाकला, आणि मग त्याने नेहमीसाठी आपली जादुगरी सोडून दिली.

त्याच्याजवळ जो थोड़ा पैसा होता तो लवकरच संपला. मग त्याचे कपडे फाटले आणि त्याने खाण्यासाठी भीक मागितली आणि लोकांच्या दरवाज्यावर झोपला, जसे तो लहानपणी करत असे..

“आता आपल्या घरी जाण्याची वेळ आली आहे,” म्हाताऱ्याने थकून म्हटलं. आणि तो परत सोरेटला परतला.

ज्या दिवशी तो सोरेंटोला परत आला, ती थंडीची रात्र होती.

जोरात वारं वाहत होतं, आणि बर्फाचा पाऊस होत होता.

तो लिटिल ब्रदर्स चर्चकडे गेला.

पण तिथं खिडकीत अंधार होता.

ओलं आणि थंड, म्हातारा जियोवानी चर्चमध्ये घुसला आणि एका कोपऱ्यात जावून झोपला. लवकरच त्याला झोप लागली.





सकाळच्या संगीत ऐकून त्याला जाग आली. चर्च, मेणबत्तीच्या प्रकाशात झगमगत होते आणि लोक गाणं गात होते, "ग्लोरिया! ग्लोरिया!'

एवढी सुंदरता बघून जियोवानीला आपल्या डोळ्यांवर विश्वास बसला नाही. पुजारी, बहिणी आणि नगरवासियांची एक मोठी मिरवणूक आणि प्रत्येकाकडे एक सुंदर भेटवस्तू होती.ते चर्च कडे येत होते.

त्यांनी आपआपल्या भेटी एक स्त्री आणि तिचा मुलगा यांच्या मूर्ती समोर ठेवल्या.

“हे सगळं काय आहे? जवळ उभ्या असणाऱ्या एका महिलेला जियोवानीने विचारले.

“आजोबा तुम्हांला माहित नाही का-आज पवित्र मुलगा येशूचा जन्मदिवस आहे.” महिला म्हणाली. “म्हणून तर त्या भेटवस्तूंची मिरवणूक निघाली आहे.”



गीत संपे पर्यंत जियोवानी विस्मयाने बघत राहिला. मग हळू-हळू चर्च रिकामे झाले आणि ती स्त्री आणि मुल यांच्या चारी बाजूला  चमकणाऱ्या मेणबत्या सोडल्या तर सगळीकडे अंधार पसरलेला होता.

जियोवानी मूर्तीच्या जवळ आला. आईच्या कुशीतला मुलगा त्याला खूप गंभीर आणि कठोर वाटत होता.





“हे, स्त्रिये " जियोवानी म्हणाला. “जर माझ्याजवळ सुद्धा मुलाला देण्यासाठी काही असतं. इतक्या सुंदर भेटी देवूनही तुमचा मुलगा खूप दुःखी आणि उदास दिसत आहे. पण थांबा – मला लोकांना हसवता येते.”

मग जियोवानीने आपली पिशवी उघडली आणि आपला जुना पोषाख काढला.त्याने आपला विदुषकाचा मुखवटा घातला, छोटा गालिचा टाकला आणि मग आपल्या करामती दाखवू लागला.

सगळ्यात आधी दांड्या,मग ताटल्या. त्यानंतर ताटल्या दांड्यावर फिरवले आणि मग बाटल्या आणि रिंगा.

दरवाजा बंद करण्यासाठी आत येणाऱ्या ब्रदर सेक्स्टनने  जियोवानीला करामती दाखवतांना पाहिलं. ब्रदर सेक्स्टन एकदम भयभीत  झाला.

"फादर,"  तो ओरडला, आणि मग मुख्य पुजाऱ्याला बोलवण्यासाठी तो पळाला.

"अधर्म होत आहे, लवकर चला!"



पण  जियोवानीने न ब्रदर सेक्स्टनचा आवाज ऐकला आणि न त्याला पाहिलं.

"आणि आता," मुलाकडे हसत बघत जियोवानी म्हणाला.

"आधी लाल चेंडू, मग नारंगी."



“मग पिवळा.”

“आणि हिरवा, निळा आणि जांभळा .”

सगळे चेंडू  हवेत आता इंद्रधनुष्यसारखे दिसत होते.

आणि शेवटी , जियोवानी ओरडला, “स्वर्गात सूर्य!” सोनेरी चेंडू वर चारी बाजूला,उंच खूप उंच उडाला.
जियोवानीने पूर्ण जीवनभर एवढ्या चतुराईने करामत केली नव्हती.

उंच, खूप उंचीवर, वेगात अजून वेगात. हवेत रंग भरले गेले. ते दृश्य एकदम भव्य दिसत  होते.

जियोवानी चे ह्रदय धडकू लागले.

“हे तुझ्यासाठी आहे, बाळा!” तो आनंदाने ओरडला.





तेव्हा अचानक त्याचे म्हातारे शरीर थांबले.
आणि जियोवानीचे मृत शरीर फरशीवर पडले.



मुख्य पुजारी आणि ब्रदर सेक्सटन पळत आत आले. म्हातारा जियोवानीच्या जवळ जाऊन वाकून पाहत मुख्य पुजारी म्हणाले, “बघ तो गरीब विदुषक आता मेला आहे. त्याच्या आत्म्याला शांती मिळो.”

पण ब्रदर सेक्सटन मागे सरकला आणि त्याने ती स्त्री आणि तिच्या पवित्र मुलाच्या मूर्तीकडे बघितले. ते दृश्य बघून त्यांने आ वासलेला तसाच राहिला. "अहो फादर," तो इशारा करत म्हणाला. "फादर, ज़रा तिकडे बघा!”

मुलगा हसत होता, आणि त्याच्या हातात सोनेरी चेंडू होता.



समाप्त